राज्यसेवा (मुख्य) परिक्षा-२०१५ व २०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, गट ब संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधी (सीपीटीपी -४) करिता निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे रद्द करणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कअस १३१६/प्र.क्र.१३२/१४ब

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ३०.०७.२०१८

**वाचा:-**

शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २९.०७.२०१७ व २६.०९.२०१७

**प्रस्तावना:-**

राज्यसेवा परीक्षा २०१५ व २०१६ द्वारे मंत्रालयीन कक्ष अधिकारी पदासाठी शिफारस केलेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम सीपीटीपी-४ अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या ३२ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांसाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गामध्ये सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर ३२ अधिसंख्य पदे दिनांक २९.०७.२०१७ ते ३१.०७.२०१९ या कालावधीसाठी निर्माण करण्यात आली होती. तथापि राज्यसेवा परीक्षा २०१५ द्वारे शिफारस केलेल्या १३ उमेदवारांपैकी ५ उमेदवार प्रशिक्षणाकरिता रूजू झालेले नाहीत. तसेच राज्यसेवा परीक्षा २०१६ द्वारे शिफारस केलेल्या १९ उमेदवारांपैकी ९ उमेदवार प्रशिक्षणास रूजू झाले आहेत व ७ उमेदवारांस शासनाने प्रशिक्षणास रूजू होण्यास १ वर्षांकरिता मुदतवाढ दिलेली असून उर्वरित उमेदवार प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये रूजू झाले नाहीत. यास्तव संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये, दिनांक २९.०७.२०१७ ते ३१.०७.२०१९ या कालावधीसाठी निर्माण करण्यात आलेल्या ३२ पदांपैकी १५ अधिसंख्य पदे रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम सीपीटीपी- ४ अंतर्गत संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गामध्ये सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर दिनांक २९.०७.२०१७ ते ३१.०७.२०१९ या कालावधीसाठी निर्माण करण्यात आलेल्या ३२ अधिसंख्य पदांपैकी १५ अधिसंख्य पदे या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३०११४५००२२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.07.30 11:47:31 +05'30'

( ग.भि.गुरव )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
७. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव, का. क्र. १८-ब, २६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
११. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती.